शहापूर पोलीस ठाणे गुन्हा नोंद क्रमांक १९०/१० मधून उद्भवणा-या प्रकरणांमध्ये शासनातर्फे विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून नियुक्त करण्यात आलेले ॲड श्री. वैभव बगाडे यांना व्यावसायिक फी मंजूर करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

शासन निर्णय क्र. एसपीपी २०११/प्र.क्र.250/पोल-१०

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२. दिनांक : १६ सप्टेंबर, २०११.

संदर्भ :- शासन अधिसूचना, विधी व न्याय विभाग क्र. एसपीपी-२०११/ए.एस.६२/डी-चौदा, दिनांक २०.०८.२०११.

<u>शासन निर्णय</u> :- आदिवासी मागासवर्गीय कृषि संस्था कवडास, ता. शहापूर, जि.ठाणे या संस्थेने शासनाची मान्यता घेऊन डिसेंबर, २००९ मध्ये कवडास येथे मतिमंद मुलांचे बालगृह सुरु केले. सदर बालगृहात बाल कल्याण समिती, ठाणे यांच्या मार्फतीने विशेष सरंक्षण व काळजीसाठी एकूण २५ मतिमंद मुले व मुली दाखल झाल्यानंतर, सदर संस्थेचे संबंधीत पदाधिकारी व नोकर यांनी संस्थेच्या अभिरक्षेत असलेल्या मतीमंद मुला-मुलींवर लैंगिक अत्याचार करुन पेटत्या सिगारेटचे चटके देवून व हाताने, काठीने मारहाण करुन दुखापती केल्या. तसेच, पिडित मुलांना पुरेसे अन्न व वेळेवर वैद्यकीय उपचार न देता, त्यांना कुपोषित ठेवून त्यांचा मृत्यू घडवून आणण्यास कारणीभूत झाले. याप्रकरणी शहापूर पोलीस ठाणे, गुन्हा नोंद क्रमांक १९०/१० मधून उद्भवणा-या न्यायालयीन प्रकरणांमध्ये शासनाच्या वतीने काम पाहण्यासाठी ॲड. श्री. वैभव बगाडे यांची विधी व न्याय विभागाच्या वरील संदर्भाधीन दिनांक २०.८.२०११ च्या अधिसूचनेन्वये विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून नियुक्ती करण्यात आली आहे.

२. सबब, प्रस्तुत प्रकरणी ॲड. श्री. वैभव बगाडे यांना रू.१०,०००/- प्रमाणे प्रतिदिन परिणामकारक सुनावणी फी अदा करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे. तसेच, प्रस्तुत प्रकरणी त्यांना अपरिणामकारक सुनावणी फी, विचारविनिमय फी किंवा अन्य कोणत्याही प्रकारची फी अनुज्ञेय असणार नाही.

३. परिणामकारक सुनावणीचे दिवस संबंधीत न्यायालयाच्या अभिलेख्यांवरुन संबंधीत प्रकरणाच्या पोलीस उपायुक्त दर्जाहून कमी नाही, अशा पर्यवेक्षीय अधिका-याकडून प्रमाणित करुन

घेण्यात यावेत व कोणत्याही प्रकारचे अतिरिक्त प्रदान होणार नाही, याची दक्षता घ्यावी.

४. यासाठी येणारा खर्च या विभागाच्या मागणी क्र.मागणी क्र. बी-१, २०५५ पोलीस - (००) १०९, जिल्हा पोलीस (००) (०१) जिल्हा पोलीस दल - (२०५५ ०१६८) - २८ व्यावसायिक व विशेष सेवा या लेखाशिर्षाखालील त्या त्या आर्थिक वर्षाच्या मंजूर अनुदानातून व मासिक निधी विवरणपत्रानुसार भागविण्यात यावा.

५. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.सीआर- ४९७/११/व्यय-७, दिनांक ६.९.२०११ अन्वये मिळालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय राज्य शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध करून देण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०११०९१६१३०९०८००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( वि. वि. दपके )
कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

प्रति,

- पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई .
- पोलीस अधीक्षक, ठाणे.
- जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे .
- विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
- वित्त विभाग (व्यय- ७), मंत्रालय, मुंबई.
- ॲड. श्री. वैभव बगाडे, बी-३०५, समाजदीप को. ऑप. हौ.सा., अदुकीया रोड, एस. व्ही. रोड, कांदिवली (पश्चिम), मुंबई-४०० ०६७.
- निवड नस्ती (पोल-१०).